**कर्तव्यस्थानी दिलेल्या शासकीय**
**निवासस्थानासाठी अनुज्ञप्ति शुल्काची वसूली**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घभाव-२०१०/प्र.क्र.४/सेवा-५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १९ एप्रिल, २०११

पहा :-१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीओ-१४७८/सी आर-३२७/सेवा-५, दि.१७ एप्रिल, १९७८.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर-१२८७/६४३/सेवा १०, दि.२५ एप्रिल १९८८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक घभाव-१४८९/४०/सेवा-५, दि.३० डिसेंबर १९९१.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक घभाव-२०००/प्र.क्र.९७/२०००/सेवा-५, दि.१७ फेब्रुवारी २००१.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक घभाव-१००४/प्र.क्र.२८/सेवा-५ दि.२१ सप्टेंबर २००६.

## शासन निर्णय

मुंबई नागरी सेवा नियम, १९५९, खंड १मधील नियम ८४९(बी) च्या तरतूदीनुसार कर्तव्यस्थानी दिलेल्या शासकीय निवासस्थानासाठी शासकीय कर्मचाऱ्यांस त्यांच्या वित्तलब्धीच्या १० टक्के किंवा निवासस्थानाचे प्रमाणित भाडे ह्यापैकी जे कमी असेल तेवढे अनुज्ञप्ती शुल्क द्यावे लागते.

२. राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी २००६ पासून सुधारित वेतनसंरचना लागू करण्यात आलेली आहे. या सुधारणा लक्षात घेता शासकीय निवासस्थानाच्या अनुज्ञप्ति शुल्काच्या दरात सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. यासंबंधीच्या सर्व बाबींचा विचार करुन शासन असे आदेश देत आहे की, शासकीय कर्मचाऱ्यांच्या सुधारीत वेतनसंरचनेनुसार कर्तव्यस्थानी पुरविलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या शासकीय निवासस्थानांसाठीचे अनुज्ञप्ति शुल्काचे दर खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे असतील व ते सर्व राज्यभर एकरुपतेने लागू असतील. संबंधित कर्मचाऱ्यांच्या वेतनानुरुप निवासस्थानाच्या पात्रतेचा विचार न करता प्रत्यक्षात ताब्यात असलेल्या निवासस्थानाच्या प्रकारासाठी अनुज्ञप्ति शुल्काची वसुली केली जाईल.

**तक्ता**

| अ.क्र. | कर्मचाऱ्यास अनुज्ञेय असलेले ग्रेड वेतन (रुपये) | अनुज्ञेय निवासस्थानाचा प्रकार | अनुज्ञेय चटईक्षेत्र (चौरस फूट) | अनुज्ञप्ति शुल्काचा ठराविक दर (रुपये दरमहा) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | १८०० पेक्षा कमी | एक | २२० पर्यंत | १२० |
| २ | १८०१ ते २८०० | दोन | २२१-३२० | २६० |
| ३ | २८०१ ते ४२०० | तीन | ३२१-४२० | ४४० |
| ४ | ४२०१ ते ५४०० | चार | ४२१-५५० | ५८० |
| ५ | ५४०१ ते ७६०० | पाच | ५५१-७५० | ९२० |
| ६ | ७६०० व त्याहून अधिक | सहा | ७५१-१११० व त्याहून अधिक | १,४०० |

३. अनुज्ञप्ति शुल्काचे वरील सुधारित दर दिनांक १मे २०११ पासून अंमलात येतील.

४.	काही शासकीय निवासस्थानांना सेवकांसाठी निवासव्यवस्था आणि/अथवा स्वतंत्र वाहनतळ, छप्पर असलेली किंवा छप्पर नसलेली जागा(गॅरेज) जोडलेली असते. शासन असे आदेश देत आहे की, दिनांक १ मे २०११ पासून मुख्य निवासस्थानांच्या धारकाकडून सेवकाच्या निवास व्यवस्थेसाठी व चार चाकी वाहनाच्या वाहनतळासाठीच्या अतिरिक्त जागेसाठी खालीलप्रमाणे स्वतंत्र शुल्काची वसुली करण्यात यावी :-

| अ.क्र. | मुख्य निवासस्थानाबरोबरची अतिरिक्त जागा | शुल्काचा दर (रु. दरमहा) |
|---|---|---|
| १ | सेवकाचे निवासस्थान | १२० |
| २ | स्वतंत्र वाहनतळ (गॅरेज) | १२० |
| ३ | वाहनासाठी छप्पर असलेली जागा | ८० |
| ४ | वाहनासाठी उघडी जागा | ४० |

५.	वर परिच्छेद २ मध्ये विहित केलेल्या दराने करावयाच्या अनुज्ञप्ति शुल्काच्या वसुली शिवाय सेवा शुल्काची स्वतंत्र वसुलीही तशीच चालू ठेवण्यात यावी. शासनाने असेही ठरविले आहे की, दिनांक १ मे २०११ पासून विद्यमान सेवा शुल्क दुप्पट करण्यात यावे. प्रत्येक निवासस्थानासाठी किंवा निवासस्थानाच्या समुहांसाठी सेवा शुल्काचे सुधारित दर दर्शविणारे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत स्वतंत्रपणे निर्गमित केले जातील.

६.	मुंबई नागरी सेवा नियम, १९५९ मधील ह्यासंबंधातील सध्याच्या तरतूदी या आदेशाच्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आल्या आहेत असे समजले जावे. या नियमांना औपचारीक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०४१११७१०१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( स. अ. मु. नकवी )
उप सचिव, वित्त विभाग

प्रति,

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुबई
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
मंत्रालयीन सर्व विभाग
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
#आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जि.अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती

# सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
#प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,
मुंबई/नागपूर/औरंगाबाद
राज्य महिला आयोग, वरळी ,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड. पुणे
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक,
मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
# पत्राने

कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
कुलसचिव, महाराष्ट्र पशू व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई / पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
बहूजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बॅरॅक क्रमांक १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट ,मुंबई-२१
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-५)